**छत्रपती संभाजीनगर महानगरपालिकेतील उप अभियंता (स्थापत्य) संवर्गातील अधिकाऱ्यांना कार्यकारी अभियंता या पदावर पदोन्नती देण्यास <u>शासन मान्यता देण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-छसंमनपा-२०२४/प्र.क्र.३/नवि-२४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ७ जून, २०२४

**वाचा :-** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी २०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दिनांक १८.२.२०२१

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी २०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दिनांक ७.५.२०२१

३) आयुक्त तथा प्रशासक,छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका यांचे पत्र क्र.जा.क्र.मनपा/साप्र(आस्था-१)/२०२३/१९३८, दिनांक २२.१२.२०२३.

४) आयुक्त तथा प्रशासक,छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका यांचे पत्र क्र.जा.क्र.मनपा/साप्र(आस्था-१)/२०२४/४१, दिनांक ८.१.२०२४.

**<u>प्रस्तावना :-</u>**

छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका आस्थापनेवरील कार्यकारी अभियंता पदावरील रिक्त पदाची संख्या तसेच कामाची निकड लक्षात घेता खुल्या प्रवर्गातून कार्यकारी अभियंता या पदावर वेतनश्रेणी एस-२३ रु.६७७००-२०८७०० (सातवा वेतन आयोग) मध्ये पदोन्नती करण्यासाठी महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ५४(१) अन्वये गठीत केलेल्या निवड समितीची बैठक दिनांक १.१२.२०२३ व दिनांक ५.१.२०२४ रोजी घेण्यात आली. संदर्भ क्र.२ मध्ये नमूद सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय दिनांक ७.५.२०२१ मधील सूचनांनुसार निवड समितीने या बैठकीमध्ये सेवाज्येष्ठतेनुसार खुल्या प्रवर्गातून तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यासाठी श्री.फालक व श्री.रामदासी, उप अभियंता, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका यांना पात्र ठरवून त्यांना कार्यकारी अभियंता, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका या पदावर तात्पुरती पदोन्नती देण्याकरिता एकमताने शिफारस केली आहे.

२. सदर शिफारशीच्या अनुषंगाने, आयुक्त तथा प्रशासक,छत्रपती संभाजीनगर, महानगरपालिका यांनी श्री.काशीनाथ मुरलीधर फालक व श्री.सुमंत श्रीरामबुवा रामदासी, उप अभियंता, छत्रपती संभाजीनगर महानगपालिका यांना कार्यकारी अभियंता (स्थापत्य), छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका या वर्ग -१ संवर्गातील पदावर तात्पुरत्या पदोन्नतीच्या प्रस्तावास छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका सेवा (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम २०२१ मधील नियम ६ नुसार शासनाची मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र.३ व ४ वरील पत्राद्वारे सादर केला आहे. प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने श्री.काशीनाथ मुरलीधर फालक व श्री.सुमंत श्रीरामबुवा रामदासी, उप अभियंता (स्थापत्य) यांना कार्यकारी अभियंता या पदावर तात्पुरती पदोन्नती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका आस्थापनेवरील कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर पदोन्नतीकरीता महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ५४(१) अन्वये गठीत निवड समितीने केलेल्या शिफारशी नुसार सेवाज्येष्ठतेनुसार खुल्या प्रवर्गातून तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यासाठी पात्र ठरविलेल्या श्री.काशीनाथ मुरलीधर फालक, उप अभियंता व श्री.सुमंत श्रीरामबुवा रामदासी, उप अभियंता छत्रपती संभाजीनगर महानगपालिका यांना कार्यकारी अभियंता (स्थापत्य), वेतनश्रेणी एस-२३ , रु.६७७००-२०८७०० (सातवा वेतन आयोग) छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका या पदावर तात्पुरती पदोन्नती देण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. यानुसार आयुक्त, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका यांनी पुढील कार्यवाही करावी.

२. सदर पदोन्नती मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दिनांक ४.८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या निर्णयाच्या अधीन असेल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०६०७१६२९२८६३२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2024.06.07 16:42:53 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (गृह, विधि व न्याय), यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त), यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव यांचे विशेष कार्य अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५) आयुक्त तथा प्रशासक, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका,छत्रपती संभाजीनगर.
६) श्री.काशीनाथ मुरलीधर फालक, उप अभियंता,छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका
७) श्री.सुमंत श्रीरामबुवा रामदासी, उप अभियंता, छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका
८) निवडनस्ती नवि-२४